अक्कलकोट पंचायत समिती (जिल्हा सोलापूर)
प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीत बांधकामास
प्रशासकीय मान्यता देणेबाबत....

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.९३/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ०४ जुलै,२००९

संदर्भ :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,सोलापूर यांचे पत्र क्र.जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/१३३/ दिनांक- २६.०६.२००९

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी संदर्भीय दिनांक २६.०६.२००९ च्या पत्रान्वये अक्कलकोट पंचायत समितीची प्रशासकीय इमारत अपुरी पडत असल्याने विस्तारीत इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

अक्कलकोट पचांयत समितीची अस्तित्वात असलेली इमारत सन १९६८ साली बांधण्यात आलेली असून, सदर इमारतीचे जोते क्षेत्रफळ ३९४.२७ चौ.मी.आहे. ही इमारत लोडबेअरिंग स्ट्रक्चर पध्दतीने बांधण्यात आलेली आहे. या इमारतीमध्ये गट विकास अधिकारी, सभापती, उप सभापती, एकात्मिक बालविकास प्रकल्प कार्यालये, तालुका आरोग्य कार्यालय व विस्तार कार्यालय आणि सभागृह इत्यादी कार्यालये लहान अशा जागेत कार्यरत आहेत. तसेच शिक्षण विभाग, बांधकाम विभाग, ग्रामीण पुरवठा पशुवैद्यकीय विभाग, लघुपाटबंधारे विभाग, आरोग्य विभाग ही सर्व कार्यालये एकाच ठिकाणी बांधण्याच्या दृष्टीने विस्तारीत इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. या प्रकरणी अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी उपलब्ध जागा विचारात घेवून, विस्तारीत इमारतीच्या बांधकामाचा आराखडा खाजगी वास्तुशास्त्रज्ञांकडून तयार करुन घेतला आहे. त्यामध्ये ४४ मी. X १४.१० मी. असे ६२०.४० चौ.मी. जोता क्षेत्रफळाचे (तळमजला व पहिला मजला एकूण १२४०.८०चौ.मी. क्षेत्रफळाचे ) बांधकाम प्रस्तावित करण्यात आले आहे. सदर विस्तारीत इमारतीच्या बांधकामासाठी रु.१,७२,३५,३९७/- इतक्या किंमतीचे ढोबळ अंदाजपत्रक तयार करण्यात तयार करण्यात आले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत असून ते उप अभियंता, जि.प.उपविभाग, अक्कलकोट व कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प., सोलापूर यांनी साक्षांकित केले आहे. या कामी अक्कलकोट पंचायत समितीने दिनांक १९.५.०९ च्या मासिक सभेत ठराव क्र. ३०४ पारीत केला आहे. अति.मुख्य कार्यकारी जिल्हा परिषद, सोलापूर यांनी प्रस्तावासोबत बांधकामाचा नकाशा, जुन्या इमारतीचा ले- आऊट प्लॅन, लीड चार्ट व मालमत्तेच्या रजिस्टर कार्डातील उतारा इ.कागदपत्रे सादर केलेली आहेत.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, अक्कलकोट पंचायत समितीच्या रु.१,३६,३९,१००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या विस्तारीत इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

अक्कलकोट (जिल्हा-सोलापूर ) पंचायत समितीच्या विस्तारीत प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये-१,३६,३९,१००/- (रुपये एक कोटी छत्तीस लक्ष एकोणचाळीस हजार शंभर फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित अक्कलकोट पंचायत समितीच्या विस्तारीत प्रशासकीय इमारतीचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि., मुंबई तद्वतच स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

२. अक्कलकोट पंचायत समितीच्या विस्तारीत प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount |
| 1 | Construction Cost of Admn. Extention Bldg. | 10911285.00 |
| 3 | 11% Electrification charge | 1200241.00 |
| 4 | 8 % External water supply & Sanitation charges | 872902.00 |
| 6 | 4% Contingencies charges | 436451.00 |
| 7 | 2% Computerization charges | 218225.00 |
| | Total Rs. | 13639104.00 |
| | Say Rs. | 13639100.00 |

३. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

४. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०७०४१८१२३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त पुणे विभाग, पुणे.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद सोलापूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सोलापूर
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा पुणे विभाग, पुणे
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सोलापूर
१०) सभापती, पंचायत समिती, अक्कलकोट, जिल्हा सोलापूर
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अक्कलकोट, जिल्हा सोलापूर
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई